**सहकारी संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण करण्यासाठी कर्मचारी वर्ग अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सगृयो-२०२४/प्र.क्र.४०/१४-स**
नवीन प्रशासन भवन,१४ वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २६ मार्च, २०२५

**वाचा :-**

**१.** शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४.
**२.** शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.राजस १००८/प्र.क्र.५३८/५स, दिनांक ०५.०५.२०११.
**३.** सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे :-
   १. जा.क्र.आस्थापना/कक्ष-१/ गृहनिर्माण वित्तसंस्था /मुदतवाढ/२०२५/१९४, दि.२२.०१.२०२५ चे पत्र
   २. जा.क्र. आस्थापना/कक्ष-१/रास्तलेस/मुदतवाढ/२०२५/१९२, दि.२२.०१.२०२५ चे पत्र.
   ३. जा.क्र.आस्थापना/कक्ष-४/फिरते पथक/मुदतवाढ/२०२५/१८०, दि.२२.०१.२०२५ चे पत्र.
   ४. जा.क्र.आस्थापना/कक्ष-१/ बृहन्मुंबई गृहनिर्माण/मुदतवाढ/२०२५/१९८, दि.२२.०१.२०२५ चे पत्र
**४.** शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सगृयो-२०२३/ प्र.क्र.२४ / १४-स, दि.०३.०३.२०२३.
**५.** शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सगृयो-२०२३/ प्र.क्र.२४ / १४-स, दि.०५.१०.२०२३
**६.** शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सगृयो-२०२३/प्र.क्र.४०/१४-स, दि.१४.०३.२०२४.
**७.** शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सगृयो-२०२४/प्र.क्र.४०/१४-स, दि.२५.०९.२०२४.
**८.** वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक :पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क./ दिनांक ०३.०३.२०२५

**शासन निर्णय :-**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील दिनांक ०५.०५.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये विभागातील स्थायी / अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार सुधारीत आकृतीबंध वित्त विभागाच्या मान्यतेनंतर निश्चित करण्यात आला आहे. संदर्भ क्र.६ येथील दि.२५.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सहकारी संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण करण्यासाठी विवरणपत्र-१ मध्ये दर्शविण्यात आलेल्या चार योजनांवरील परिशिष्ट अ, ब, क व ड मध्ये नमूद एकूण ६७ अस्थायी पदांना दिनांक २९.०२.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता/मुदतवाढ देण्यात आली आहे. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्र.३ चे पत्रांन्वये चार योजनांवरील एकूण ६७ अस्थायी पदांना दिनांक २८.०२.२०२६ पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याबाबतच्या प्रस्तावाची कार्यवाही सहकार आयुक्त यांच्याकडून सुरु आहे. सदर प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यानंतर छाननीअंती मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेस्तव सादर करण्यात येणार आहे. या कार्यवाहीस काही कालावधी लागणे अपेक्षित आहे.

२. वित्त विभागाने दि.०३.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश

आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार दिले आहेत.

३. वरील वस्तूस्थिती विचारात घेता खालील विवरणपत्र-१ मध्ये दर्शविल्यानुसार ४ योजनांवरील ६७ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

विवरणपत्र-१

| अ.क. | योजनेचे नाव | अस्थायी पदाची संख्या |
|---|---|---|
| १ | सहकारी संस्थांसाठी नेमलेल्या राज्यस्तरीय लेखासमितीमधील अस्थायी पदे (परिशिष्ट "अ" प्रमाणे) | १३ |
| २ | फिरते पथक (विभागीय पातळीवरील अस्थायी पदे) (परिशिष्ट "ब" प्रमाणे) | १८ |
| ३ | बृहन्मुंबईतील सहकारी गृहनिर्माण संस्था संविधानिक लेखापरीक्षणासाठी निर्मिलेली अस्थायी पदे (परिशिष्ट "क" प्रमाणे) | ३० |
| ४ | महाराष्ट्र राज्य सहकारी गृहनिर्माण वित्तीय संस्था महामंडळ मर्या.,मुंबई (परिशिष्ट "ड" प्रमाणे) | ६ |
| | **एकूण** | **६७** |

४. वरील ४ योजनांवरील एकूण ६७ अस्थायी पदांचा तपशिल परिशिष्ट अ, ब, क, ड मध्ये दर्शविण्यात आला आहे. या पदावरील खर्च खाली नमूद लेखाशिर्षाखाली सन २०२५-२०२६ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा :-

मागणी क्रमांक : व्ही- २,
मुख्य लेखाशिर्ष २४२५, सहकार,
१०१, सहकारी संस्थांचे लेखापरिक्षण,
१०१-(०१) (०१) लेखापरिक्षणासाठी कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२४२५०२२७)

५. सदर मुदतवाढ वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये देण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२६१४४९५१६३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PALLAVI KISHOR KOLEKAR

Digitally signed by PALLAVI KISHOR KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ba35d79c9fe547ea6b606f742ced2d6ebfd2c68412e49f5edac040ea7952ed5d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E01062E9C78C4616D627A8CF0A5B109EDC1A71F9A6CD0F92B84DDFCFC6C858AC, cn=PALLAVI KISHOR KOLEKAR
Date: 2025.03.26 14:50:40 +05'30'

**(पल्लवी कोळेकर)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र मुंबई.
२. महालेखापाल- १ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पूणे.
९. अप्पर निबंधक, सहकारी संस्था (लेखा परीक्षण) महाराष्ट्र राज्य सहकार आयुक्त व निबंधक, यांचे कार्यालय, पुणे.
१०. सहनिबंधक, सहकारी संस्था, (लेखापरीक्षा),५ बी.जे.रोड, सहकारी संघ इमारत क्र.१,३ रा माळा, पूणे-१.
११. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था,
१२. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (लेखापरीक्षण),
१३. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१४. सर्व जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था.
१५. विशेष लेखापरीक्षक (वर्ग-१), सहकारी संस्था, (फिरते पथक) मुंबई,नाशिक, पूणे, औंरगाबाद, नागपूर.
१६. जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था, वर्ग-१, कनमुर हाऊस, २ रा मजला,नरसी नाथा स्ट्रीट,मस्जिद,मुंबई
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी गृहनिर्माण वित्त महामंडळ मर्या, हाऊसफिन भवन, प्लॉट नं. सी २१, ई ब्लॉक, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, रिझर्व्ह बॅकेच्या मागे, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
१८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई-३२.
१९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (वित्तीय सुधारणा-१) मंत्रालय, मुंबई-३२.
२०. कक्ष अधिकारी (५-स, १७-स,) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२१. निवडनस्ती (१४-स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

## परिशिष्ट-अ

१. योजनेचे नाव :- सहकारी संस्थांसाठी नेमलेल्या राज्यस्तरीय लेखासमितीमधील अस्थायी पदांचा तक्ता

| अ.क्र. | पदनाम | पदे |
|---|---|---|
| १ | सहनिबंधक, सहकारी संस्था (ले.प.) | १ |
| २ | लेखापरिक्षक श्रेणी-१ | २ |
| ३ | लघुलेखक (निम्न श्रेणी) | १ |
| ४ | लेखापरिक्षक श्रेणी-२ | २ |
| ५ | उपलेखापरिक्षक | १ |
| ६ | लिपीक | २ |
| ७ | वाहन चालक | २ |
| ८ | शिपाई | २ |
| | एकूण | १३ |

------------------

## परिशिष्ट-ब

२. योजनेचे नाव :- फिरते पथक (विभागीय पातळीवरील) लेखापरीक्षणासाठी निर्मिलेल्या अस्थायी पदांचा तक्ता

| अ.क्र. | पदनाम | पदे |
|---|---|---|
| १ | विशेष लेखापरीक्षक वर्ग-१ | ५ |
| २ | लेखापरीक्षक श्रेणी-१ | ३ |
| ३ | लिपीक | ४ |
| ४ | लघुलेखक/लघुटंकलेखक | ४ |
| ५ | शिपाई | २ |
| | एकूण | १८ |

-------------------

**परिशिष्ट-क**

**३. योजनेचे नाव :- बृहन्मुंबईतील सहकारी गृहनिर्माण संस्था संविधानिक लेखापरीक्षणासाठी निर्मिलेल्या अस्थायी पदांचा तक्ता**

| अ.क्र. | पदनाम | पदे |
|---|---|---|
| १ | विशेष लेखापरिक्षक वर्ग-२ | ७ |
| २ | लेखापरिक्षक श्रेणी-२ | ७ |
| ३ | उपलेखापरिक्षक | ७ |
| ४ | लिपीक | ९ |
| | एकूण | ३० |

---------------

**परिशिष्ट-ड**

**४. योजनेचे नाव :- महाराष्ट्र राज्य सहकारी गृहनिर्माण वित्तीय संस्था महामंडळ मर्या., मुंबई लेखापरीक्षणासाठी निर्मिलेल्या अस्थायी पदांचा तक्ता**

| अ.क्र. | पदनाम | पदे |
|---|---|---|
| १ | सहनिबंधक | १ |
| २ | लेखापरिक्षक श्रेणी-१ | १ |
| ३ | लेखापरिक्षक श्रेणी-२ | १ |
| ४ | उपलेखापरिक्षक | १ |
| ५ | कनिष्ठ लिपीक | २ |
| | एकूण | ६ |

---------------